त्र्यंबक, आळंदी, जेजुरी, पंढरपूर , तुळजापूर, रामटेक व पैठण सन -२०१४१५ चे यात्राकर अनुदान वितरित करण्याबाबत .

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः क्र.संकीर्ण२०१४/प्र.क्र.६१/नवि-४

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २७.२.२०१५

**वाचा :-**

१) शासन निर्णय नगर विकास व आरोग्य विभाग क्र.जी एनटी१४७७ /१८२० /नवि-१०, दि.११/१/१९७८

२) शासन निर्णय नगर विकास विभाग, क्र.याकअ २०११ / प्र.क्र.१३८/२०११/नवि-१६, दि.६ जुलै, २०११

३) शासन निर्णय नगर विकास विभाग, क्र.संकीर्ण२०१४/प्र.क्र.६१/नवि-४, दि.३ जुलै, २०१४

**प्रस्तावना :-**

राज्यातील सात नगरपरिषदांच्या हद्दीत त्र्यंबक), आळंदी, जेजुरी, पंढरपूर , तुळजापूर, रामटेक व पैठण) यात्रास्थळांच्या ठिकाणी येणा-या यात्रेकरुंकडून वसूल करीत असलेला यात्राकर बंद करुन संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये सदर नगरपालिकांना यात्राकर अनुदान देण्याचा शासनाने निर्णय घेतला होता. संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये विहित केलेल्या मर्यादेत संदर्भाधीन क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये पंढरपूर नगरपरिषदेस रु.२ कोटी अनुदान वितरित करण्यात आले आहे. उर्वरित ६ नगरपरिषदांना(त्र्यंबक, आळंदी, जेजुरी, पंढरपूर, तुळजापूर, रामटेक व पैठण) चालू वर्षाचे यात्राकर अनुदान वितरित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय:-

सदर प्रयोजनासाठी चालू आर्थिक वर्षातील तरतूद रू. ६,१५,००,०००/- च्या ८५ % मर्यादेत निधी वितरित करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यामुळे, यात्राकर रद्द केल्यामुळे नगरपालिकांना द्यावयाचे सहायक अनुदानापोटी पंढरपूर नगरपरिषद वगळता उर्वरित त्र्यंबक, आळंदी, जेजुरी, तुळजापूर, रामटेक व पैठण या नगरपरिषदांकरिता रु.३,२२,७५,०००/-(रुपये तीन कोटी बावीस लक्ष पंच्याहत्तर हजार फक्त) इतकी रक्कम शिल्लक राहते. सदर अनुदान खाली दिलेल्या तपशीलानुसार वितरित करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. सदरचा निधी वितरित करण्यासाठी संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक

अधिकारी म्हणून व उपसंचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरचे अनुदान त्र्यंबक, आळंदी, जेजुरी, तुळजापूर, रामटेक व पैठण नगरपरिषदांना वितरित करण्याबाबत आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांनी पुढील कार्यवाही करावी.

| अ.क्र. | नगरपरिषदेचे नांव | रक्कम (रुपये) |
|---|---|---|
| १ | त्र्यंबक नगरपरिषद | ३८,८८,५५४/- |
| २ | आळंदी नगरपरिषद | ५०,५५,१२०/- |
| ३ | जेजुरी नगरपरिषद | ५८,३२,८३१/- |
| ५ | तुळजापूर नगरपरिषद | १,१६,६५,६६३/- |
| ६ | रामटेक नगरपरिषद | १९,४४,२७७/- |
| ७ | पैठण नगरपरिषद | ३८,८८,५५५/- |
| | एकूण ... | ३,२२,,७५,०००/- |

१) या प्रकरणी होणारा खर्च मागणी क्रमांक-एफ-४, लेखाशीर्ष ३६०४, स्थानिक स्वराज्य संस्था व पंचायत राज्य संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, २००, इतर संकीर्ण नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा--,(००)(०२)यात्रा कर रद्द केल्यामुळे नगरपरिषदांना द्यावयाचे सहायक अनुदान(३६०४ ०१४७) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

२) सदरील आदेश वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६४ /व्यय-३, दि. ६.२.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१६१४३८५७७१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajesh Hanmant Padhye

Digitally signed by Rajesh Hanmant Padhye
DN: CN = Rajesh Hanmant Padhye, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2015.02.27 15:05:16 +05'30'

प्रत,

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई

२. विभागीय आयुक्त,पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपूर

३. जिल्हाधिकारी(नाशिक, पुणे,उस्मानाबाद, नागपूर, औरंगाबाद)

४. महालेखापाल,( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २,मुंबई/नागपूर

५. अधिदान व लेखा अधिकारी, मंबई

६. मुख्याधिकारी , त्रयंबक, आळंदी, जेजुरी, पंढरपूर, तुळजापूर, रामटेक व पैठण

७. कार्यासन व्यय-३/अर्थसंकल्प-१६/कोषा-५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

८. सचिव (नवि-२), यांचे विशेष कार्य अधिकारी (नवि-२)

९. निवडनस्ती(नवि-४) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई